पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्त केलेल्या मे. पीडब्ल्यूसी कंपनीस माहे मे, २०१८ ते माहे जून, २०१८ या कालावधीकरीता केलेल्या कामाचे देयक अदा करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : सीसीटी-३६१६/प्र.क्र.७६/भाग-३/पोल-३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, २ रा मजला, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ डिसेंबर, २०१८

वाचा:

१. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.०१.०७.२०१४, दि.१९.०७.२०१७, दि.०९.१०.२०१७
२. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीसीटी ३६१५/प्र.क्र.९३/पोल-३, दि.२९.०५.२०१५
३. गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक : सीसीटी ३६१५/प्र.क्र.७६/भाग-१/पोल-३, दि.२५.०७.२०१६, दि.५.६.२०१७ व दि.२५.०७.२०१७
४. माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्रमांक : GAD-मातंस ०८०/४/२०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दि.२०.०३.२०१८
५. पोलीस आयुक्त, पुणे शहर यांची दि.०५-०७-२०१८ रोजीची पत्र.
६. मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.ली.यांची माहे मे,२०१८ ते माहे जून,२०१८ या कालावधीचे देयकांबाबत दि ३०-०७-२०१८ चे रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी तांत्रीक सल्लागार म्हणुन गृह विभाग, शासन निर्णय दि.२९.०५.२०१५ अन्वये मे. प्राईस वॉटर हाऊस कुपर प्रा.ली. या कंपनीची नियुक्ती करण्यात आली आहे. तद्नंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.०७.२०१६ व ०५.०६.२०१७ अन्वये पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागार म्हणून मे. प्राईस वॉटरहाऊस कुपर्स प्रा.ली. या कंपनीला मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागारास दि.१.११.२०१६ ते दि.३०.०६.२०१७ या आठ महिन्यांच्या कालावाधीसाठी ही मुदतवाढ देण्यात आली आहे. तसेच तद्नंतर गृह विभाग, शासन निर्णय दि.२५.७.२०१७ अन्वये मे. पीडब्ल्युसी कंपनीच्या एका वरिष्ठ सल्लागारास पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्प सल्लागार म्हणून दि.१.७.२०१७ ते दि.३०.६.२०१८ या कालावाधीसाठी मुदतवाढ देण्यात आली आहे. माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. सदर कंपनीने

उपरोक्त प्रकल्पासंदर्भात प्रकल्प सल्लागार म्हणुन माहे मे,२०१८ ते माहे जून,२०१८ या दोन महिन्याच्या कालावधीसाठी पाहिलेल्या कामाची देयके उपरोक्त संदर्भाधीन क्र.४ येथील नमूद दि.१२.०३.२०१८ च्या पत्रान्वये सादर केली आहेत. तसेच पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे प्रकल्प सल्लागार मे. पीडब्ल्यूसी कंपनी यांचे माहे माहे मे,२०१८ ते माहे जून,२०१८ या दोन महिन्यांचे काम समाधानकारक आहे व प्रकल्प सुरळीत व समाधानकारक चालू असल्याबाबतचा अहवाल पोलीस आयुक्त, पुणे शहर यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्र.५ येथील नमूद पत्रांन्वये सादर केला आहे. त्यानुसार पुणे शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्यूसी कंपनीने सादर केलेली सदर देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

पुणे व पिंपरी चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी मे. पीड्ब्ल्युसी कंपनीची प्रकल्प सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. माहिती व तंत्रज्ञान विभाग, शासन निर्णय दि.२०.०३.२०१८ अन्वये निश्चित केल्यानुसार त्यांना मानधन अनुज्ञेय करण्यात आले आहे. त्यानुसार मे.पीड्ब्ल्युसी कंपनीच्या एका वरीष्ठ सल्लागाराने माहे मे,२०१८ ते माहे जून,२०१८ या दोन महिन्याच्या कालावधीसाठी पाहिलेल्या सल्लागाराच्या कामासाठी देयक म्हणुन (मानधन, इतर खर्च व वस्तू आणि सेवा कर मिळून) एकुण रु.५,९४,७२०/- (अक्षरी पाच लाख चौ-यान्नव हजार सातशे वीस फक्त) इतकी रक्कम मे.पीड्ब्ल्युसी कंपनीस अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा सविस्तर तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| Pune CCTV Project (May २०१८ to June २०१८) | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| # | Period & Invoice No. | Month | Designation | Man Month Rate as per GR dated (२०-Mar-१८) | Deployment (Percentage) | Applicable Amount per Resource (INR) | Out of Pocket Expenses (OPE) | Total Applicable Amount | GST @ १८% | Total Amount (INR) |
| A | B | C | D | E | F | G = EXF | H | I = G + H | J = १८% OF I | K = I+J |
| १ | १st May २०१८ to ३०th June २०१८ & ४१११६०१३२६८ | May-१८ | Senior Consultant | २,५२,००० | १००% | २,५२,००० | ० | ५,०४,००० | ९०,७२० | ५,९४,७२० |
| | | June-१८ | Senior Consultant | २,५२,००० | १००% | २,५२,००० | ० | | | |
| Total | | | | | | | | ५,०४,००० | ९०,७२० | ५,९४,७२० |

**टीपः-**

अ) उपरोक्त देयक या संदर्भात नमुद शासन निर्णय क्र.१ मध्ये नमुद केल्यानुसार सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सल्लागारांना दरमहिना दरमाणुस (Man-Month) तत्वानुसार अदा करण्यात येत आहे.

ब) शासन निर्णय संदर्भ क्र.१ नुसार सल्लागारांना प्रकल्पावर होणा-या खर्चाच्या ५% च्या प्रमाणात प्रवास, भोजन व निवास इ. खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे.

क) संदर्भ क्र.४ अन्वये मे. पीड्ब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या देयकानुसार सदर रकमा देण्यात येत आहेत. सदर रकमांमध्ये मे,२०१८ ते माहे जून,२०१८ या दोन महिन्यांच्या कालावधीसाठी १८% वस्तू आणि सेवा कर समाविष्ट करण्यात आला आहे.

ड) सीसीटीव्ही प्रकल्पासाठी संबधित कंपनीला सल्लागाराच्या मानधनापोटी जादा रक्कम अदा केली आली आहे असे निदर्शनास आल्यास सदर जादा रक्कम संबंधित कंपनीकडून समायोजीत करण्याचा अधिकार शासनास राहील.

इ) सदर देयके आयकर वजाती करून अदा करण्यात यावी.

२. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असलेल्या "२०५५ - पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस बल, १३, कार्यालयीन खर्च (२०५५ ०१६८)" या लेखाशीर्षाखाली टाकून तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२८१७००४८९२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.12.28 17:09:29 +05'30'

**( दिनेश सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.

५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. पोलीस आयुक्त, पुणे शहर.

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे .

१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.

११. मे. पीडब्ल्युसी प्रा.लि., २५२, वीर सावरकर मार्ग, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-४०० ०२८.

१२. अर्थ शाखा, गृह विभाग.

१३. निवड नस्ती / पोल-३.

*****